**माननीय सर्वोच्च न्यायालयाने सिव्हिल अपिल क्र. ८९२८/२०१५ व इतर याचिका यामध्ये दिनांक ०६ जुलै, २०१७ रोजी दिलेल्या निर्णयाची राज्यात अंमलबजावणी करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक-न्यायाप्र-२०१९/प्र.क्र.११०/१९/प्रशा-५**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२
दिनांक:-०४ जानेवारी, २०२०

**संदर्भ :-**

१) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक- बीसीसी-२०१८/प्र.क्र.३०८/१६-ब, दिनांक २१ डिसेंबर, २०१९

२) आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे, यांचे पत्र क्र.संकीर्ण२०१९/अ.ज.माहिती/ आस्था-ब (१२३), दिनांक २४ डिसेंबर, २०१९

**प्रस्तावना :-**

माननीय सर्वोच्च न्यायालयाने सिव्हिल अपिल क्र. ८९२८/२०१५ (चेअरमन ॲन्ड मॅनेजिंग डायरेक्टर, एफसीआय आणि इतर विरुध्द जगदिश बालाराम बहिरा व इतर ) व इतर याचिका यामध्ये दि. ६ जुलै,२०१७ रोजी मागास जातींना असलेल्या आरक्षणाच्या आधारे शासकीय सेवेत दाखल झालेल्या व त्यानंतर जातीचे दावे अवैध ठरलेल्या व्यक्तींना शासकीय सेवेत संरक्षण देय ठरत नाही, असा निर्णय दिला आहे. माननीय उच्च न्यायालय, मुंबई खंडपीठ नागपूर यांनी रिट याचिका क्र. ३१४०/२००८ मध्ये दिनांक २८.०९.२०१८ च्या आदेशान्वये माननीय सर्वोच्च न्यायालयाच्या आदेशानुसार दिनांक ३१.१२.२०१९ पर्यंत कार्यवाही करण्याचे आदेश दिले आहेत. मा. उच्च न्यायालयाचे सदर आदेश विचारात घेता, मा. सर्वोच्च न्यायालयाच्या निर्णयाची या विभागाच्या अधिपत्याखाली आयुक्त शिक्षण व त्याच्या अधिनस्त कार्यालयात अंमलबजावणीसाठी अधिसंख्य पदे निर्माण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय : -**

मा. सर्वोच्च न्यायालयाने सिव्हिल अपिल क्र.८९२८/२०१५ व इतर याचिकामध्ये दिनांक ०६ जुलै, २०१७ रोजी दिलेल्या निर्णयान्वये या विभागाच्या अधिपत्याखालील विभागीय शिक्षण उपसंचालक कार्यालयाच्या आस्थापनेवर अनुसूचित जमातीचे जात प्रमाणपत्र अवैध ठरलेल्या कर्मचाऱ्यांची माहिती या शासन निर्णयासोबत जोडलेल्या सहपत्रात नमूद करण्यात आली आहे. सदर सहपत्रात नमूद गट-क मधील ११ व गट-ड मधील ३ अश्या एकूण १४ कर्मचाऱ्यांसाठी संबंधित विभागीय शिक्षण उपसंचालक यांच्या आस्थापनेवर १४ अधिसंख्य पदे निर्माण करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. अनुसूचित जमातीचे जात वैधता प्रमाणपत्र सादर न केल्याच्या कारणास्तव अधिसंख्य पदावर सेवा वर्ग करण्यात येणाऱ्या कर्मचाऱ्यांना मानवतावादी दृष्टीकोनातून तसेच प्रशासनाची होणारी अडचण दूर करण्यासाठी तात्पुरत्या स्वरुपात ११ महिन्यांकरीता किंवा ते सेवेत राहिले असते तर ते ज्या दिनांकाला सेवानिवृत्त झाले असते, त्या दिनांकापर्यत यापैकी जे आधी घडेल तोपर्यत अधिसंख्य पदावर नेमणूक देण्यात येत आहे.

३. सोबत जोडलेल्या सहपत्रातील कर्मचाऱ्यांच्या संबंधित नियुक्ती प्राधिकारी यांनी, सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भाधीन दि. २१ डिसेंबर,२०१९ रोजीच्या शासन निर्णयासोबत जोडलेल्या परिशिष्ट-क मधील नमुन्यानुसार नियुक्ती आदेश तात्काळ निर्गमित करुन त्यांची सेवा तातडीने अधिसंख्य पदावर वर्ग करावी व त्याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा.

४. सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भाधीन दिनांक २१ डिसेंबर,२०१९ रोजीच्या शासन निर्णयातील परिच्छेद ३ मध्ये नमूद केल्यानुसार पदभरतीची कार्यवाही करण्यात यावी.

५. हा शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभागाच्या क्र. बीसीसी२०१८/प्र.क्र.३०८/१६-ब दिनांक २१.१२.२०१९ च्या शासन निर्णयामधील तरतुदीनुसार, तसेच अप्पर मुख्य सचिव(सेवा), सामान्य प्रशासन विभाग (सेवा) यांच्या अध्यक्षतेखालील उपसमितीने चक्रीय पध्दतीने दिलेल्या मान्यतेस अनुसरुन व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ६०३/आपुक दिनांक ०२.०१.२०२० अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

६. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक क्रमांक २०२००१०७१११३३४७४६२१ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Santosh Basaveshwar Mamadapure

Digitally signed by Santosh Basaveshwar Mamadapure
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=School Education and Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=3bfe111652996d95372924b1d22cdf88b33dfa2a3de3d8ea011b7d83adc40cb6,
serialNumber=557abe7a7194ec5ddc74df537d7d57a9dbda20b1937a2e41983c35f6a38b6ad8, cn=Santosh Basaveshwar Mamadapure
Date: 2020.01.07 11:17:38 +05'30'

**( संतोष ममदापुरे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य
२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य
३. मा. उपमुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य
४. मा. मंत्री, शालेय शिक्षण यांचे स्वीय सहाय्यक

५. मा. राज्यमंत्री, शालेय शिक्षण यांचे स्वीय सहाय्यक
६. महालेखापाल - १ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई ४०० ०२०.
७. महालेखापाल - १ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई ४०० ०२०.
८. महालेखापाल - २ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, नागपूर
९. महालेखापाल - २ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर
१०.अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. सचिव, सामान्य प्रशासन विभाग (१६-ब), मंत्रालय, मुंबई
१३. आयुक्त (शिक्षण) यांचे कार्यालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१४. सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक
१५. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी,
१६. निवडनस्ती.

शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र. न्यायाप्र-२०१९/प्र.क्र.११०/१९/प्रशा-५ ,

दि.०४ जानेवारी, २०२० सोबतचे सहपत्र.

| **अ.क्र.** | **कर्मचाऱ्यांचे नाव** | **गट** | **संबंधित कर्मचाऱ्यांकरिता निर्माण करण्यात येणाऱ्या अधिसंख्य पदाचे पदनाम** | **आस्थापना** |
|---|---|---|---|---|
| १ | श्री. एस. एस. मडकई | क | मुख्य लिपीक | विभागीय शिक्षण उपसंचालक, कोल्हापूर विभाग, कोल्हापूर |
| २ | श्री. बी. आर. कोळी | क | वरिष्ठ लिपीक | |
| ३ | श्री. व्ही. एस. गुरव | क | कनिष्ठ लिपीक | |
| ४ | श्रीम. एल. एम. दुर्गावळे | ड | शिपाई | |
| ५ | श्री. बी. एम. कोळी | ड | शिपाई | |
| ६ | श्री. शांताराम तेजराम डेकाटे | क | मुख्य लिपीक | विभागीय शिक्षण उपसंचालक, नागपूर विभाग, नागपूर |
| ७ | श्री. भारत शिवदास ढवळे | क | मुख्य लिपीक | |
| ८ | श्री. आर. एस. निनावे | क | लेखापाल | |
| ९ | श्री. वसंत नानाजी बारापात्रे | क | कनिष्ठ लेखापरिक्षक | |
| १० | श्री. एस. एम. ढोले | क | वरिष्ठ लिपीक | |
| ११ | श्री. रमेश महादेव राऊत | क | कनिष्ठ लिपीक | |
| १२ | श्री. अजय नागोसे | ड | शिपाई | |
| १३ | श्री. प्रविण लक्ष्मीकांत पिसे | क | वरिष्ठ लिपीक | विभागीय शिक्षण उपसंचालक, अमरावती विभाग, अमरावती |
| १४ | श्री. गणेश कृष्णराव बायस्कर | क | कनिष्ठ लिपीक | |

XXXXXX